# कामगार सूर्य हरपला .....





## नारायण गंगाराम सुर्वे

नेटाक्षरीची ह्या कामगारसूर्यास भावपुर्ण श्रद्धांजली.......

नेटअक्षरी
दिनांक – १६ ऑगस्ट २०१०

साहित्यक्षेत्रात "कामगार कवी" म्हणून प्रसिद्ध असलेले ज्येष्ठ कवी नारायण गंगाराम सुर्वे, यांचा जन्म मुंबईच्या गिरणगावात १५ ऑक्टोबर १९२६ रोजी झाला. खरं तर एका गरीब गिरणी कामगाराला सापडलेला हा अनाथ मुलगा त्याने आपल नाव देवून सांभाळला. अतिशय गरिब कुटुंबात जन्मलेल्या नारायण सुर्वे यांचे बालपण खूप हालाखीचे होते. प्रतिकूल आणि खडतर परिस्थितीतही त्यांना ७ वी पर्यंत शिक्षण मिळाले. कळू लागल्यावर त्यांनीही गिरणीतच काम सुरु केले. फुटपाथावर झोपून छोटी-मोठी कामं करत पुढे जगण्यासाठी धडपड करताना अक्षरशः पडेल ते काम त्यांनी केले. कधी शाळेत शिपायाची नोकरी तर कधी हमाली सुद्धा केली. पुढे त्याच शाळेत थोडे आणखीन शिकून ते प्राथमिक शिक्षकाचे काम करू लागले. एवढ्या कष्टमय वातावरणत वाढूनही या कवीमनाच्या हृदयात फारशी कटूता दिसली नाही. उलट माणसातील माणुसकीवर अपार श्रद्धा ठेवून मानव्याची जोपासना करणारा हा कवी होता.

सुर्वे यांनी कामगारांचे जीवन अतिशय जवळून अनुभवले होते. कामगार जीवनाशी असलेल्या थेट संबंधामुळे शाळेत शिक्षक म्हणून शिकवत असतानाच त्यांनी कामगार चळवळीत सहभागी होण्याचा निर्णय घेतला. १९७०च्या दशकात भारत, तत्कालीन सोवियत रशिया आणि पूर्वेकडील देशांमध्ये सक्रीय कामगार नेते म्हणून त्यांची नवी ओळख निर्माण झाली. मुंबईतील कामगार संघटनेत काम करताना त्यांनी कामगारांच्या हक्कांसाठी तीव्र संघर्ष केला. विशेष म्हणजे या कामगार चळवळीच्या काळातही कवितेशी असणारी मैत्री त्यांनी कधीच तोडली नाही.

'ऐसा गा मी ब्रह्म' (१९६२) हा त्यांचा पहिला काव्यसंग्रह. सुर्वे यांच्या १९६६ मध्ये प्रकाशित झालेला ‘माझे विद्यापीठ’ या काव्यसंग्रहाने साहित्यविश्र्व खळबळून टाकले होते. या संग्रहात मुंबईत राहणा-या गरिबांचे आणि हालाखीच्या परिस्थितीत जगणा-या कामगारांच्या जीवनाचे वास्तव मांडण्यात आले होते. "माझे विद्यापीठ" संग्रहाला महाराष्ट्र शासनाचा पुरस्कारही प्राप्त झाला. त्यानंतरचे जाहीरनामा (१९७८), ऐसा गा मी ब्रम्ह, सनद, मानुष कलावंत आणि समाज, सर्व सुर्वे (वसंत शिरवाडकर संपादीत) हे काव्यसंग्रह देखिल प्रचंड गाजले.

त्यांच्या तुमचंच नाव लिवा, मुंबई, तेच ते, माझ्या देशाच्या नोंदबुकात माझा अभिप्राय अशा अनेक कविता खूप लोकप्रिय ठरल्या. भाकरीचा चंद्र शोधण्यातच जिंदगी बरबाद झालेल्या आणि राबता-खपता आयुष्य मेणबत्तीसम विझवून घेणार्या कामगारांचे वास्तव त्यांनी जगासमोर आणले. मराठीतील चाकोरीबध्द, वृत्तबद्ध, कवितेला चाकोरी बाहेरच मुक्त आकाश दाखवत त्यांनी धगधगीत वास्तव लोकांपुढे आणलं.

परभणी येथे १९९५ मध्ये संपन्न झालेल्या मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषवले होते. साहित्य अकादमीवर मराठी साहित्य या विषयासाठी नेमलेल्या सल्लागार समितीवर समन्वयक म्हणूनही त्यांनी काम पाहिले होते. कवितेतून भीषण वास्तव मांडणा-या नारायण सुर्वे यांना १९९८मध्ये पद्मश्री पुरस्काराने सन्मानित करण्यात आले होते. त्यांना सुवर्ण कमळ आणि १९९९च्या कबीर पुरस्काराने गौरविण्यात आले. अशा या वलय विरहित काव्यसूर्याचे सोमवार दिनांक १६ ऑगष्ट २०१० रोजी ठाणे (मुंबई) येथे दीर्घ आजाराने निधन झाले.

ह्या ज्येष्ठ कवीस व कामगार सूर्यास नेटाक्षरीची ही भावपूर्ण श्रद्धांजली !!!

सुरेश शिरोडकर

# दोन दिवस

दोन दिवस वाट पाहण्यात गेले दोन दुःखात गेले

हिशोब करतो आहे आता किती राहिलेत डोईवर उन्हाळे

शेकडो वेळा चंद्र आला, तारे फुलले, रात्र धुंद झाली

भाकरीचा चंद्र शोधण्यातच जिंदगी बर्बाद झाली

हे हात माझे सर्वस्व, दारिद्र्याकडे गहाणच राहिले

कधी माना उंचावलेले, कधी कलम झालेले पाहिले

हरघडी अश्रू वाळविले नाहीत; पण असेही क्षण आले

तेव्हा अश्रूच मित्र होऊन साहाय्यास धावून आले

दुनियेचा विचार हरघडी केला अगा जगमय झालो

दुःख पेलावे कसे, पुन्हा जगावे कसे, याच शाळेत शिकलो

झोतभट्टीत शेकावे पोलाद तसे आयुष्य छान शेकले

दोन दिवस वाट पाहण्यात गेले दोन दुःखात गेले.



# इतका वाईट नाही मी

इतका वाईट नाही मी; जितका तू आज समजतेस

दाहक नव्हते ऊन जितके तू आज समजतेस

तडजोड केली नाही जीवनाशी; हे असे दिवस आले

आयुष्यभर स्वागतास पेटते निखारेच सामोरे आले

हारलो कैकदा झुंजीत; तूच पदराचे शीड उभारलेस

हताश होऊन गोठलो; तूच पाठीवर हात ठेवलेस

कसे जगलो आपण, किती सांगू, किती करून देऊ याद

पळे युगसमान भासली;नाही बोलवत. नको ती मोजदाद.

अशी उदास, आकुल, डोळ्यांत जहर साठवीत पाहू नको

आधीच शरमिंदा झालो आहे; अधिक शरमिंदा करू नको

आयुष्य घृणेत सरणार नाही; हवीच तर घृणाही ठेव.

ज्या खडकावर घुसळलीस मान त्या माणसावर विश्वास ठेव.



# तुमचंच नांव लिवा

मास्तर , लिवा-
तुमचंच नांव लिवा

खरं सांगते; मई आईला समरून सांगते
लिवा तुमी-
ह्येच्या केसाची बटा बगा मास्तर
कसा नागाचा फ़डा हाय त्यो
अवं ग्येवाचं देणं हाय त्ये... ग्येवाचं.

मास्तर जिमीन उतमातती...
व्हय उफ़ानती , पन...
नांगुर घातल्याबिना आन्,
बी पेरल्याबिना,
रोप वर उगतं का ? उगतं ? बोला .
मंग बापाच्या जागी माजं नाव लावून कसं चालंल ?
बाप न्हाई म्हनलं तर पोराचं कसं जमंल ?

कनच्याबी देवाचं नाव नगा लिवू
मानसाचंच लिवा...
देवानं काय केलंय हो,
वटी तेनंच भरली ही...
तुमचंच लिवा.

जात नगा इच्यारू;
अवं, आमी कुना येकाची का बाय्ली हावंत मास्तर,
घरोट्यातल्या बाया नव्हत आमी
त्येवडं कुटलं नशिबाला...

तेचा जलम हितलाच
फ़ाटला जलामला त्यो;
पॉट निरनाखाली सराकलं;
ना सुईण , ना काय जवळ,
मन चराकलं, .. प्न मग हराकलं.

पड पोरा, पड पाया.
पड ह्येंच्या पाया.
पर तेवडं तुमचंच नाव लिवा.



# शीगवाला

'क्या लिखतो रे पोरा!'
'नाही चाचा - - काही हर्फ जुळवतो.'
म्हणता, म्हणता दाऊदचाचा खोलीत शिरतो
गोंडेवाली तुर्की टोपी काढून
गळ्याखालचा घाम पुसून तो 'बीचबंद' पितो
खाली बसतो;
दंडा त्याचा तंगड्या पसरून उताणा होतो.

'एक ध्यानामदी ठेव बेटा!
सबद लिखना बडा सोपा है
सब्दासाठी जीना मुश्कील है.'

देख ये मेरा पाय
साक्षीको तेरी आई काशीबाय
'मी खाटीक आहे बेटा - मगर
गाभणवाली गाय कभी नही काटते.'

तो - सौराज आला; गांधीवाला।
रहम फरमाया अल्ला।
खूप जुलूस मनवला चालवालोने
तेरे बापूने -
तेरा बापू; चालका भोंपू।

हां; तर मी सांगत होता;
एक दिवस मी बसला होता कासाईबाडेपर
बकरा फाडून रख्खा होता सीगपर
इतक्यामंदी समोर झली बोम
मी धावला; देखा -
गर्दीने घेरा था; तुझ्या अम्मीला
काटो बोला
अल्ला हू अकबरवाला
खबरदार; मै बोला
सब हसले, बोले,
ये तो साला निकला पक्का हिंदूवाला

"फिर; काफिरको काटो!"
अल्लाहुवाला आवाज आला
झगडा झाला।
सालोने खूब पिटवला मला
मरते मरते पाय गमवला।
सच की नाय काशिबाय - ?

'तो बेटे -
आता आदमी झाला सस्ता - बकरा म्हाग झाला
जिंदगीमध्ये पोरा, पुरा अंधेर आला,
आनि सब्दाला;
जगवेल असा कोन हाये दिलवाला
सबको पैसेने खा डाला।'



# कठीण होत आहे

दररोज स्वतःला धीर देत जगणे; कठीण होत आहे

किती आवरावे आपणच आपणाला; कठीण होत आहे

भोकांड पसरनार्या मनास थोपटीत ज्होपवून येतो

भूसा भरलेले भोत दिसुनही; थांबणे कठीण होत आहे

तडजोडीत जगावे. जगतो: दररोज कठीण होत आहे

आपले अस्तित्व असुनही नाकारने; कठीण होत आहे

समजुन समजावतो, समजावूनही नच मानलो

कोठारात काड़ी न पडेल, हमी देणे; कठीण होत आहे.



# ऊठ

जीवनापासून पळुन जावे तर जावे कुठे?

आकाशीच्या बापाशी पहिल्यापासून वैर होते.

एकट्याने गज तोडून उडावे; एवढे बळ कुठे?

अवघ्या वाटांवर ठाई ठाई पाहरे होते.

बोंब मारून बोलवावा असा स्वर्ग आहेच कुठे?

ज्यासाठी आमचे आतडे तीळ तीळ तुटत होते.

ऊठ! तेवढी ती कोपर्यातली तलवार शोधून ठेव

एके काळी तिच्यावर मी माज्हे नशीब घासले होते.



# विझता विझता स्वतःला

झूट बोलून आयुष्य कुणालाही सजवता येते

अशी आमंत्रने आम्हालाही आली; नाहीच असे नाही.

असे किती हंगाम शिळ घालित गेले घरावरून

शब्दानी डोळे उचलून पाहिलेच नाही; असेही नाही.

शास्त्र्याने दडवला अर्थ, आम्ही फक्त टाळच कुटावे

आयुष्याचा अनुवादच करा म्हणुन सांगनारे खुप; नाहीच असेही नाही.

असे इमान विकत घेणारी दुकाने पाड्यापाड्यावर

डोकी गहाण टाकनारे महाभाग नाहीत असेही नाही.

अशा बेईमान उजेडात एक वात जपून नेताना

विझता विझता स्वतःला सावरलेच नाही; असेही नाही.



# अस्तित्व

जेव्हा मी या अस्तित्व पोकळीत नसेन

तेव्हा एक कर

तू निःशंकपणे डोळे पूस.

ठीकच आहे चार दिवस-

उर धपापेल, जीव गुदमरेल.

उतू जणारे हुंदके आवर,

कढ आवर.

नवे हिरवे चूडे भर!

उगिचच चीर वेदनेच्या नादी लगू नकोस

खुशाल, खुशाल तुला आवडेल असे एक घर कर

मला स्मरून कर,

हवे तर मला विस्मरून कर.



# माझी आई

जेव्हा तारे विझू लागत
उंच भोंगे वाजू लागत
पोंग्याच्या दिशेने वळत
रोज दिंड्या जात चालत
झपाझप उचलीत पाय
मागे वळून बघीत जाय
ममतेने जाई सांगत
नका बसू कुणाशी भांडत
वर दोन पैसे मिळत.

दसऱ्याच्या आदल्या दिनी
जाई पाचांसह घेऊनी
फिरू आम्ही आरास बघत
साऱ्या खात्यांतून हुंदडत
किती मजा म्हणून सांगू
शब्दासाठे झालेत पंगू
भिंगऱ्या पेपेटे घेऊन
फुग्यांचे पतंग झोकून
जात असू पक्षी होऊन.



एक दिवस काय झाले
तिला गाडीतून आणले
होते तिचे उघडे डोळे
तोंडातून रक्त भळभळे
जोडीवालीण तिची साळू
जवळ घेत म्हणाली बाळू
मिटीमिटी पाहात होतो
माझे छत्र शोधीत होतो
आम्ही आई शोधीत होतो.

त्याच रात्री आम्ही पांचानी
एकमेकास बिलगूनी
आईची मायाच समजून
घेतली चादर ओढून
आधीचे नव्हतेच काही
आता आई देखील नाही
अश्रूंना घालीत अडसर
जागत होतो रात्रभर
झालो पुरते कलंदर.

# ऐसा गा मी ब्रह्म



घालीन मी सार्या | ब्रह्मांडास पाठी |
सोडवीन गांठी | दिक्कालांच्या ||
विश्वाचे गोकुळ | खेळे माझ्या दारीं |
सूर्याची लगोरी | टिचवीन ||
ढगांचा गा हत्ती | बांधीन मी दारीं |
भरीन घागरी | अमृताने ||
वार्याची भिंगरी | अंगणीच फिरे |
स्वर्गांचीं गोपुरें | तिडमीडे ||
उभे करीन मी | वाकल्या आभाळा |
शिक्षा केली त्याला | दंडवीन ||
राईचा पर्वत | पर्वताचि राई |
दोन्हीं मज ठायीं | सामावली ||
ऐसा गा मी ब्रह्म | विश्वाचा आधार |
खोलीस लाचार | हक्काचिया

netaksharee@gmail.com